महिला व बाल विकास विभागांतर्गत जिल्हाधिकारी यांचे अध्यक्षतेखालील जिल्हास्तरावर गठीत केलेल्या विविध समित्याचे एकत्रिकरण करुन एकच “जिल्हास्तरीय संनियंत्रण समिती” पुनर्रचित करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : मबावि २०२४/प्र.क्र.४३/का.०२**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०५ मार्च, २०२४.

**संदर्भ :** १. शासन निर्णय, समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रिडा व पर्यटन क्र.डिपीए-१०८३/८०५१९/सीए-३, दि.२९.०१.१९८५.
२. शासन निर्णय, समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रिडा व पर्यटन क्र.डिपीए-१०४७/९४६९/(३७२३)/सुधार-३, दि.०४.११.१९८७.
३. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र.ममघो-२००१/प्र.क्र.९६/का-१०, दि.१८.०१.२००२.
४. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र.संकीर्ण-२००६/प्र.क्र.१९५/का-२,दि.३०.०८.२००६.
५. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र.आयटीपीए-२००५/प्र.क्र.२६४/का-३,दि.२०.०९.२००६.
६. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र.मसके-२००७/प्र.क्र.२२६/का-२, दि.१३.०२.२००८.
७. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र. संकीर्ण-२०११/प्र.क्र.२६/का-२,दि.०२.११.२०११.
८.शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, क्र.८१/२००१/मवियो-२००/प्र.क्र.४२९/का.२, दि.२५.०५.२००१.
९. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र.वस्टॉसे-२०२३/प्र.क्र.२६/का-२, दि.१२.०५.२०२३.
१०. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र.सखीनि-२०२२/प्र.क्र.२९८/का.२, दि.१२.०५.२०२३.
११. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र.मसकें-२०२२/प्र.क्र.-३०८/का-२, दि.२६.०७.२०२३.

**प्रस्तावना :**

महिलांच्या संरक्षणासाठी हुंडा निर्मुलन, कौटुंबिक हिंसाचारापासून महिलांचे संरक्षण, देवदासी प्रथा निर्मुलन, अनैतिक व्यापार (प्रतिबंध) या सारख्या सामाजिक कायद्याच्या आणि महिला धोरणाच्या अंमलबजावणीकरीता तसेच, महिलांच्या विकासाकरीता विविध योजना राबविण्याच्या/अंमलबजावणीच्या अनुषंगाने संदर्भ क्र.१ ते ६ च्या शासन निर्णयान्वये जिल्हास्तरावर जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली समित्या स्थापन करण्यात आलेल्या आहेत. सदर सर्व शासन निर्णयातील समित्यांचे एकत्रिकरण करुन विविध कार्यक्रम राबविण्यासाठी दि.०२.११.२०११ रोजीच्या संदर्भ क्र.७ येथील शासन निर्णयान्वये जिल्हाधिकारी यांचे अध्यक्षतेखाली सर्व समावेशक एकच **“जिल्हा सल्लागार समिती”** गठीत करण्यात आली आहे. त्यानंतर संदर्भ क्र. ९ येथील शासन निर्णयान्वये केंद्र पुरस्कृत "मिशन शक्ती" योजनेच्या "संबल" या उपयोजनेअंतर्गत "वन स्टॉप सेंटर" तसेच संदर्भ क्र. १० ते ११ येथील शासन निर्णयान्वये "सामर्थ्य" या उपयोजनेअंतर्गत “महिला सक्षमीकरण केंद्र” व नोकरी करणाऱ्या महिलांचे वसतिगृह-"सखी निवास" या घटक योजनेची जिल्हा स्तरावर संपूर्ण अंमलबजावणी करण्याकरीता जिल्हा दंडाधिकारी/जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली **“जिल्हास्तरीय**

**संनियंत्रण समिती"** गठीत करण्यात आली आहे. महिला विकासांच्या विविध योजना अंमलबजावणीच्या अनुषंगाने जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली खालील विविध जिल्हास्तरीय समित्या गठीत करण्यात आल्या असून, सदर समित्यांची रचना व कार्य पुढीलप्रमाणे आहेत:-

| अ. क्र. | शासन निर्णय/पत्र व समितीचे नांव | अध्यक्ष | सदस्य सचिव | समिती सदस्य | समितीचे कार्ये |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १. | अ) शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रिडा व पर्यटन विभाग, क्र.डीपीए-१०८३/८०५१९/सीए-३,दि.२९.०१.१९८५.<br>**<u>(हुंडा पध्दती नष्ट करण्यासाठी जिल्हा दक्षता समिती)</u>**<br>ब) शासन निर्णय समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रिडा व सहाय्य विभाग, क्र.डीपीए १०४७/९४६९/(३७२३)/ सुधार-३, दि.०४.११.१९८७ | जिल्हाधिकारी | जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी | १) पोलीस अधिक्षक<br>२) शा.महिला संस्था<br>३) जि.समाज कल्याण अधिकारी<br>४) कायदेतज्ज्ञ<br>५) महिला महाविद्यालय<br>६) वैद्यकीय अधिकारी<br>७) सामाजिक कार्यकर्ता<br>८) महिला संस्थांचे प्रतिनिधी<br>९) स्थानिक महिला आमदार किंवा खासदार<br>१०) पोलीस सामाजिक सुरक्षा कक्षातील एक महिला | हुंडा पध्दती निर्मुलनाबाबत जनजागृती, हुंडा विरोधी कार्यक्रम अत्याचार पिडीत प्रकरणांची चौकशी, पिडित महिलांचे पुनर्वसन, कायदेविषयक मदत, अनिष्ठ प्रथेने पिडीत महिलांना सहाय्य. |
| २. | शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, क्र.८१/२००१/मवियो-२००/प्र.क्र.४२९/का.२, दि.२५.०५.२००१.<br>**<u>(हुंडा पध्दती नष्ट करण्यासाठी जिल्हा दक्षता समिती)</u>** | जिल्हाधिकारी | जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी | १) पोलीस अधिक्षक<br>२) पोलीस उपआयुक्त<br>३) अधिक्षक शासकीय महिला राज्यगृह/संरक्षण गृह | हुंडा पध्दतीस व हुंडयामुळे होणाऱ्या महिलांवरील आत्याचारास आळा घालण्यासाठी. |
| ३. | शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, क्र.आयटीपए-२००५/ प्र.क्र.२६४/का.-३, दि.२०.९.२००६. | पोलीस अधिक्षक/ पोलीस उप आयुक्त | जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी | १) मुख्य कार्यकारी अधिकारी,<br>२) जिल्हा कामगार कल्याण अधिकारी,<br>३) जिल्हा आरोग्य अधिकारी, | अनैतिक व्यापारात बळी पडणाऱ्या महिला मुलींची संख्या कमी करण्यसाठी उपाय योजना, अनैतिक |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | **(अनैतिक व्यापार प्रतिबंध करण्यासाठी जिल्हास्तरीय सल्लागार समिती)** | | | ४) जिल्हा शिक्षण अधिकारी जिल्हा समाजकल्याण अधिकारी,<br>५) जिल्हा सरकारी वकील,<br>६) जिल्हा शलयचिकित्सक,<br>७) माविम प्रतिनिधी,<br>८) बाल कल्याण समिती सदस्य, स्वयंसेवी संस्थांचे प्रतिनिधी,<br>९) बालमजूर क्षेत्रातील संस्था प्रतिनिधी | व्यापारातून सुटका केलेल्या महिला व मुलींच्या पुर्नवसनासाठी कार्यक्रम आखणे, जिल्हयातील घडामोडींवर लक्ष ठेवणे. |
| ४. | शासन निर्णय महिला व बाल विकास, क्र.मसके २००७/ प्र.क्र.२३६/का-२, दि.१३.०२.२००८.<br><br>**(कौटुंबिक हिंसाचारापासून महिलांचे संरक्षण अधिनियम २००५ त्रिस्तरीय समिती)** | जिल्हाधिकारी | जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी | १) जिल्हा पोलीस अधिक्षक<br>२) मुख्य कार्यकारी अधिकारी<br>३) जिल्हा शल्य चिकित्सक<br>४) जिल्हा आरोग्य अधिकारी<br>५) प्रांत अधिकारी<br>६) जिल्हा स्तरीय मोफत कायदेविषय समिती प्रतिनिधी<br>७) सभापती महिला व बाल विकास समिती<br>८) स्थानिक महिला संघटनांचे प्रतिनिधी<br>९) बार असोसिएशनचे प्रतिनिधी | कौटुंबिक हिंसाचाराबाबत नोंद झालेल्या घ्टनांची व कार्यवाहीची माहिती संकलीत करणे, उपविभागीय समितीस मार्गदर्शन करणे,कायद्याबाबत जनजागृती करणे इत्यादी. |
| ५. | शासन निर्णय महिला व बाल विकास क्र.संकीर्ण-२००६/ प्र.क्र.१९५/का.२, दि.३०.०८.२००६.<br><br>**(महिलांसंबंधी धोरण व हुंडा प्रतिबंध कायद्यासंदर्भात सर्वोच्च न्यायालयाने दिलेल्या निर्देशाची** | जिल्हाधिकारी | जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी | १) सभापती महिला व बाल कल्याण समिती<br>२) महिला नगरसेविका<br>३) सामाजिक संस्था महिला प्रतिनिधी<br>४) मुख्य कार्यकारी अधिकारी | महिला संबंधी धोरण व हुंडा प्रतिबंधक कायद्यासंदर्भात सर्वोच्च न्यायालयाने दिलेल्या निर्देशाची अंमलबजावणी |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | **अंमलबजावणी करण्याकरीता जिल्हा पातळीवर समिती)** | | | | जिल्हा पातळीवर करणे. |
| ६. | शासन निर्णय महिला व बाल विकास, क्र.ममघो-२००१/ प्र.क्र.९६/का-१०, दि.१८.०१.२००२.<br>**(महिला धोरण-२००१, महिला सक्षमीकरण समिती/महिला सक्षमीकरण कृतीदल, जिल्हा महिला सक्षमीकरण समिती)** | जिल्हाधिकारी | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | १) जिल्हा पोलीस प्रमुख<br>२) अध्यक्ष महिला व बाल विकास समिती<br>३) नगरपारिषद महानगरपालिका<br>४) जिल्हा लीड बँक ऑफिसर<br>५) महाव्यवस्थापक जिल्हा उद्योग केंद्र<br>६) महिला महाविद्यालयाचे प्राचार्य<br>७) जिल्हयामधील महिला खासदार/आमदार<br>८) जिल्हा प्रसिध्दी अधिकारी<br>९) जिल्हा महिला आयोगाचे प्रतिनिधी<br>१०) स्थानिक महिला संस्थांचे प्रतिनिधी<br>११) जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी<br>१२) महिला सुरक्षा क्षेत्रात आणि आर्थीक क्षेत्रात काम करणारी नामवंत व्यक्ती. | महिला घटक योजनेअंतर्गत राज्य शासन, केंद्र शासन आणि युनिसेफ पुरसकृत योजनांचा आढावा घेणे. |
| ७. | शासन निर्णय महिला व बाल विकास, क्र.वस्टॉसें २०२३/ प्र.क्र.२६/का.२, दि.१२.०५.२०२३.<br>**(केंद्र पुरस्कृत "मिशन शक्ती" या योजनेतील "संबल" या उपयोजनेंतर्गत "वन स्टॉप सेंटर" ही घटक योजना राबविण्याबाबत)** | जिल्हाधिकारी | जिल्हा महिला बाल विकास अधिकारी | १) मुख्य कार्यकारी अधिकारी<br>२) जिल्हा पोलीस अधिक्षक<br>३) पोलीस आयुक्त प्रतिनिधी<br>४) सचिव जिल्हा विधी सेवा प्राधिकरण<br>५) आयुक्त, महानगरपालिका/ मुख्याधिकारी, नगरपालिका/ नगरपालिका<br>६) जिल्हा शल्यचिकित्सक | सदर समिती योजनेच्या विविध घटकांतर्गत जिल्हा, गट आणि ग्रामपंचायत नगरपालिका प्रभागासाठी वार्षिक कृती आराखडा तयार करेल. |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | ७) जिल्हा शिक्षणाधिकारी<br>८) प्राचार्य, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय / तंत्रनिकेतन<br>९) जिल्हा माहिती अधिकारी<br>१०) जिल्हा कौशल्य विकास अधिकारी<br>११) जिल्हा उद्योग केंद्र पतिनिधी<br>१२) जिल्हा क्रिडा अधिकारी<br>१३) सहायक आयुक्त, आयुक्त,समाजकल्याण<br>१४) प्रकल्प अधिकारी, आदिवासी विकास<br>१५) सहायक आयुक्त, दिव्यांग कल्याण | |
| ८. | शासन निर्णय महिला व बाल विकास, क्र.सखीनि २०२२/ प्र.क्र.२९८/का.२ दि.१२.०५.२०२३.<br>**(केंद्र पुरस्कृत "मिशन शक्ती" या योजनेतील "सामर्थ्य" या उपयोजनेतर्गत "सखी निवास" ही घटक योजना राबविणेबाबत)** | जिल्हाधिकारी | जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी | १) जिल्हा पोलीस अधिक्षक<br>२) कार्यकारी अभियंता सा.बां. विभाग<br>३) जिल्हा शल्यचिकित्सक<br>४) जिल्हा शिक्षणाधिकारी<br>५) जिल्हा विधीसेवा प्रधिकरण प्रतिनिधी<br>६) स्वयंसेवी संस्था प्रतिनिधी | सदर समिती योजनेच्या विविध घटकांतर्गत जिल्हा, गट आणि ग्रामपंचायत नगरपालिका प्रभागासाठी वार्षिक कृती आराखडा तयार करेल. |
| ९. | शासन निर्णय महिला व बाल विकास, क्र.मसकें २०२२/ प्र.क्र.३०८/कार्या-२, दि.२६.०७.२०२३.<br>**(केंद्र पुरस्कृत "मिशन शक्ती" अंतर्गत सामर्थ्य या उपयोजने अंतर्गत महिला सक्षमीकरण केंद्र ही घटक योजना राबविण्याबाबत.** | जिल्हाधिकारी | जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी | १) मुख्य कार्यकारी अधिकारी<br>२) जिल्हा पोलीस अधिक्षक<br>३) पोलीस आयुक्तांचे प्रतिनिधी<br>४) जिल्हा विधि सेवा प्राधिकरण<br>५) आयुक्त महानगरपालिका /मुख्याधिकारी, नगरपालिका<br>६) जिल्हा शल्यचिकित्सक | जिल्हा महिला विकास वार्षिक कृती आराखडा तयार करणे, महिला सक्षमीकरण केंद्राचे संनियंत्रण करणे, डेटाबेस तयार करणे. |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | ७) जिल्हा शिक्षणाधिकारी<br>८) प्राचार्य शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय/तंत्रनिकेतन<br>९) जिल्हा माहिती अधिकारी<br>१०) जिल्हा कौशल्य विकास अधिकारी<br>११) जिल्हा उद्योग केंद्राचे प्रतिनिधी<br>१२) जिल्हा क्रिडा अधिकारी<br>१३) सहायक आयुक्त, समाजकल्याण<br>१४) प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प<br>१५) सहायक आयुक्त, दिव्यांग कल्याण<br>१६) दोन नामनिर्देशित सदस्य | |

महिला विकासांच्या विविध योजना अंमलबजावणीच्या अनुषंगाने, जिल्हाधिकारी यांचे अध्यक्षतेखाली जिल्हास्तरावर उपरोक्त तक्ताप्रमाणे विविध समित्या गठीत करण्यात आलेल्या आहेत. ज्यामुळे जिल्हाधिकारी यांचे अध्यक्षतेखाली जिल्हास्तरावरुन संनियंत्रित करावयाच्या समित्यांची संख्या जास्त झालेली आहे. सदर जिल्हास्तरीय समित्यांची संरचना व समित्यांच्या कामकाजाचे अवलोकन केले असता असे दिसून येते की, जिल्हाधिकारी तथा समिती अध्यक्ष यांचेकडे असलेल्या दैनंदिन कामांच्या व्यापामुळे सदर जिल्हास्तरीय समित्यांच्या नियमित बैठका घेणे शक्य होत नसल्याचे दिसून येते. सदर बाब विचारात घेता, संदर्भाधिन शासन निर्णय क्र.०१ ते ११ येथील केवळ जिल्हाधिकारी यांचे अध्यक्षतेखालील “जिल्हास्तरीय समिती” पुर्नरचित करुन वरील सर्व नमूद महिलांसाठीचे अधिनियम आणि विकास योजना अंमलबजावणीसाठी जिल्हाधिकारी यांचे अध्यक्षतेखाली जिल्हास्तरावर सर्व समावेशक एकच “**जिल्हास्तरीय संनियंत्रण समिती**” गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

जिल्हाधिकारी यांचे अध्यक्षतेखाली जिल्हास्तरावर संदर्भाधिन क्र.०१ ते ११ येथील शासन निर्णयान्वये जिल्हाधिकारी यांचे अध्यक्षतेखालील “जिल्हास्तरीय समिती” पुर्नरचित करुन वरील सर्व नमूद महिलांसाठीचे अधिनियम आणि महिला विकास योजनांच्या अंमलबजावणीसाठी जिल्हाधिकारी यांचे अध्यक्षतेखाली जिल्हास्तरावर खालीलप्रमाणे सर्व समावेशक एकच “**जिल्हास्तरीय संनियंत्रण समिती**” या शासन निर्णयान्वये गठीत करण्यात येत आहे:-

| **अ.क्र.** | **पदाचे विवरण** | **समिती पद** | **समितीचे आढाव्याचे विषय** |
|---|---|---|---|
| १ | जिल्हाधिकारी | **अध्यक्ष** | |

| | | | |
|---|---|---|---|
| २ | आयुक्त, मनपा अथवा त्यांचे प्रतिनिधी (उपायुक्त दर्जापेक्षा कमी नसावे) | सदस्य | १) महिलांसाठी वैयक्तीक व सामुहिक योजनांचा आढावा.<br>२) हुंडा पध्दतीच्या विरोधात जनजागृती करणे.<br>३) कौटुंबिक हिसाचारापसून महिलाचे संरक्षण अधिनियम २००५ अंतर्गत प्रकरणे आढावा.<br>४) अनैतिक व्यापार प्रतिबंध अधिनियमाच्या अंमलबजावणीसाठी जिल्हास्तरावर करण्यात आलेली कार्यवाही.<br>५) महिला धोरणाच्या अंमलबजावणीसाठी जिल्हासतरावर करण्यात आलेली कार्यवाहीचा आढावा.<br>६) देहविक्री व्यवसाय करणा-या महिलांच्या विविध मागण्यांच्या आढावा बाबत.<br>७) अपराधीपरिविक्षा अधिनियम<br>८) केंद्र पुरस्कृत "मिशन शक्ती" एकछत्री योजनेंतर्गत घटक योजना.<br>९) पोलीस स्टेशन आवारातील समुपदेशन केंद्रांचा आढावा.<br>१०) महाराष्ट्र भिक्षा प्रतिबंध अधिनियम.<br>११) राज्याचे "मिशन वात्सल्य" अभियान. |
| ३ | मुख्य कार्यकारी अधिकारी | सदस्य | |
| ४ | जिल्हा पोलीस अधिक्षक(ग्रामीण) / पोलीस आयुक्त अथवा त्यांचे प्रतिनिधी (उपायुक्त दर्जापेक्षा कमी नसावे) | सदस्य | |
| ५ | सचिव, जिल्हा विधि सेवा प्राधिकरण | सदस्य | |
| ६ | जिल्हा शल्य चिकित्सक/जिल्हा आरोग्य अधिकारी | सदस्य | |
| ७ | प्रांत अधिकारी (सर्व) | सदस्य | |
| ८ | मुख्य कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम | सदस्य | |
| ९ | शिक्षणाधिकारी (प्राथ.) व माध्यमिक | सदस्य | |
| १० | उप मुख्य कार्यकारी अधिकारी(ग्रामपंचायत), जिल्हा परिषद | सदस्य | |
| ११ | जिल्हा कार्यक्रम अधिकारी, महिला व बाल विकास जिल्हा परिषद | सदस्य | |
| १२ | बाल विकास प्रकल्प अधिकारी (नागरी प्रकल्प) | सदस्य | |
| १३ | प्राचार्य, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय/ तंत्रनिकेतन | सदस्य | |
| १४ | जिल्हा कौशल्य विकास अधिकारी | सदस्य | |
| १५ | जिल्हा उद्योग केंद्र, प्रतिनिधी | सदस्य | |
| १६ | महिला आर्थिक विकास महामंडळ, जिल्हा समन्वय अधिकारी | सदस्य | |
| १७ | जिल्हा समाजकल्याण अधिकारी | सदस्य | |
| १८ | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प | सदस्य | |
| १९ | जिल्हा कामगार अधिकारी | सदस्य | |
| २० | जिल्हा सह आयुक्त नगर प्रशासन | सदस्य | |
| २१ | व्यवस्थापक जिल्हा अग्रणी बँक | सदस्य | |
| २२ | जिल्हा माहिती अधिकारी | सदस्य | |
| २३ | दोन नामनिर्देशित सदस्य (महिलांसाठी काम करणाऱ्यातून दोन महिला सदस्य) | सदस्य | |
| २४ | जिल्हाध्यक्ष यांचे अध्यक्षतेखाली कार्यरत असलेल्या व पुढील कालावधीत केंद्र/ राज्य शासनाकडून गठीत करण्यात येणाऱ्या समितींमधील विविध क्षेत्रातील व्यक्ती | सदस्य | |
| २५ | जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी | **सदस्य सचिव** | |

२. **सदर "जिल्हास्तरीय संनियंत्रण समिती" च्या कामकाजाचे स्वरुप :-**

१) महिला विकासांच्या विविध योजना अंमलबजावणीच्या अनुषंगाने, संदर्भाधिन शासन निर्णय क्र.०१ ते १० येथील नमूद शासन निर्णय निहाय समितीच्या कामकाजाचे/कार्याचे विवेचन व समितीची कार्यकक्षा स्पष्ट असून त्याचप्रमाणे ते कायम राहील.

२) सदर **"जिल्हास्तरीय संनियंत्रण समिती"** सदस्य सचिव हे जिल्हास्तरीय बैठक आयोजित करतांना अध्यक्षांच्या मान्यतेने सदर बैठकीच्या विषयसूचीनुसार संबंधित सदस्यांना आंमत्रित करतील.

३) महिला विकासांच्या विविध योजना/ अधिनियम निहाय कामाचा आढावा घेण्यात यावा.

४) प्रस्तुत समितीची प्रत्येक तिमाहीमध्ये एकदा बैठक घेणे आवश्यक राहील. तसेच आवश्यकतेनुसार बैठक आयोजित करण्यात यावी.

५) बैठकीच्या विषयांच्या अनुषंगाने नामनिर्देशित सदस्य नियुक्तीचे सर्व अधिकार समितीच्या अध्यक्षांना राहतील. मात्र सदर नामनिर्देशित सदस्य संबंधीत महिला विकास योजनेशी संलग्न नसावा.

६) महिला व बाल विकास विभागाकडून वेळोवेळी नेमून दिलेल्या विषयाबाबतचे कामकाज पहावे.

७) सदर बैठकीचे इतिवृत्त दहा दिवसांच्या आत आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत शासनास सादर करण्याची जबाबदारी सदर समितीच्या सदस्य सचिव यांची राहील.

८) महिला विकास योजनेच्या विविध मार्गदर्शक सूचना/शासन निर्णय यामध्ये नमूद केलेले कर्तव्य व जवाबदाऱ्या सदर समिती पार पाडेल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०३०६१२५०५७३१३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षंकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VILAS RAMDAS THAKUR

Digitally signed by VILAS RAMDAS THAKUR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=cb156fb408217396128e8dcaeed3f6fa70d9fd209eb9efc83bdd68b308614534, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C8B1E52C5C4F922AB6EB7A0B44101C838AEA34F29FBFF0AEBE9D85C3DE3468C2, cn=VILAS RAMDAS THAKUR
Date: 2024.03.06 13:00:21 +05'30'

(वि. रा. ठाकूर)
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई,
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानमंडळ, मुंबई,
५. मा.सभापती/उपसभापती, विधान परिषद, विधानमंडळ, मुंबई,
६. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधान परिषद, विधानमंडळ, मुंबई,
७. मा.मंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
८. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
९. मा.मुख्य सचिव, मंत्रालय मुंबई,
१०.सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव /सचिव, मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई,
११.सचिव, महिला व बाल विकास यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
१२.विभागीय आयुक्त (सर्व) ,
१३.आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे,

१४.आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई,
१५.व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, बांद्रा, मुंबई,
१६.जिल्हाधिकारी (सर्व),
१७.महालेखापाल - महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
१८. महालेखापाल - महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर,
१९.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
२०.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
२१.सह सचिव, उपसचिव, अवर सचिव महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
२२.सर्व सह आयुक्त/उप आयुक्त / विभागीय उपआयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे,
२३.सर्व विभागीय उपआयुक्त, महिला व बाल विकास,
२४.सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी,
२५.महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई (सर्व कार्यासने),
२६.निवड नस्ती, कार्यासन-२.